**विश्वात्मक जंगली महाराज आश्रम ट्रस्ट, ठाणे संचलित गुरूदेव चैतन्य स्वरूप हायस्कूल व कनिष्ठ महाविद्यालय, अंभई, ता.वाडा, जि.पालघर या कनिष्ठ महाविद्यालयाचे कुडूस विभाग शिक्षण सेवा संघ, पालघर या संस्थेस हस्तांतराबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः माशाह ३११९/प्र.क्र.३४९/एसएम-१**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : ११ मार्च, २०२०

वाचा : शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्रमांक माशाह २०११/ (२१०/११) माशि-३, दिनांक १७ फेब्रुवारी, २०१२

संदर्भ : विभागीय शिक्षण उपसंचालक, मुंबई विभाग, मुंबई यांचे जा.क्र.शिउस/माध्य-२/स्थलांतर/२४४१-४२/ २०१८, दिनांक २७ डिसेंबर, २०१८ चे पत्र.

**प्रस्तावना :**

विश्वात्मक जंगली महाराज आश्रम ट्रस्ट, ठाणे संचलित गुरूदेव चैतन्य स्वरूप हायस्कूल व कनिष्ठ महाविद्यालय, अंभई, ता.वाडा, जि.पालघर या विनाअनुदानित कनिष्ठ महाविद्यालयाचे, कुडूस विभाग शिक्षण सेवा संघ, पालघर या संस्थेस हस्तांतर करण्याचा संदर्भाधीन पत्रान्वये प्राप्त झालेला प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :**

सदर शाळेचे, कुडूस विभाग शिक्षण सेवा संघ, पालघर या संस्थेकडे हस्तांतर करण्यास खाली नमूद अटी व शर्तीवर मान्यता देण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे :-

(१) सदर संस्थेचे माध्यमिक विद्यालय व कनिष्ठ महाविद्यालय सुरू असून त्यातील केवळ कनिष्ठ महाविद्यालयाचे हस्तांतर होत आहे. यास्तव कनिष्ठ महाविद्यालयास स्वतंत्र यु-डायस क्रमांक घेणे आवश्यक राहील.

(२) व्यवस्थापन बदल झालेल्या कनिष्ठ महाविद्यालयाची कोणत्याही कारणास्तव किमान पटसंख्येची अट शिथिल केली जाणार नाही.

(३) व्यवस्थापन बदल झालेल्या कनिष्ठ महाविद्यालयाच्या बाबतीत शासन परवानगीच्या/मान्यतेच्या कोणत्याही अटी व शर्तीमध्ये बदल होणार नाहीत याची खबरदारी घेण्यात यावी.

(४) शासनाकडून शाळा, शिक्षक/ शिक्षकेतर कर्मचारी, वेतन/वेतनेत्तर अनुदान, विद्यार्थी इ. बाबत वेळोवेळी विहित करण्यात येणारे अधिनियम, नियम, आदेश इ. चे पालन करणे नवीन संस्थेस बंधनकारक राहील.

(५) सदर हस्तांतर शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रिडा विभाग, क्रमांक: माशाह २०११/(२१०/११) माशि-३, दिनांक १७ फेब्रुवारी, २०१२ मध्ये विहित केलेल्या नियमानुसार व कार्यपद्धतीनुसार अंमलात येईल.

(६) सदरहू हस्तांतराबाबत शासनाकडे अथवा शिक्षण विभागाच्या क्षेत्रिय अधिकाऱ्यांकडे नव्याने कोणत्याही प्रकारच्या तक्रारी प्राप्त झाल्यास किंवा व्यवस्थापन बदला संदर्भातील अटी व शर्तीचा भंग झाल्याचे निदर्शनास

आल्यास किंवा व्यवस्थापन बदलापूर्वीच्या संस्थेतील कार्यरत शिक्षक/शिक्षकेतर कर्मचाऱ्यांच्या सेवाशर्तीचा नवीन संस्थेद्वारा भंग झाल्यास, हस्तांतरण रद्द करण्याचे अधिकार शासनास राहतील.

२. विभागीय शिक्षण उपसंचालक, मुंबई विभाग, मुंबई यांनी अनुषंगिक बाबी तपासून शाळेचे हस्तांतराबाबत पुढील कार्यवाही ४ आठवडयात करावी व केलेल्या कार्यवाहीबाबत शासनास अवगत करावे..

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००३१११११५९४९३८२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Pravin Rajaram Mundhe

Digitally signed by Pravin Rajaram Mundhe
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School Education and Sports Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=ad4976f306de2810214ec2ea330d9daea59f1d3f45fae9227a3feaa541af10d1, serialNumber=dc78036626ec580d66c0ac502d43af5f670b5ba13f51213ad071acd53714a284, cn=Pravin Rajaram Mundhe
Date: 2020.03.11 12:03:11 +05'30'

**( प्रविण मुंढे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत :**

१) शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक), शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
२) विभागीय शिक्षण उपसंचालक, मुंबई विभाग, मुंबई
३) शिक्षणाधिकारी (माध्यमिक), जिल्हा परिषद, पालघर
४) अध्यक्ष/ सचिव, विश्वात्मक जंगली महाराज आश्रम ट्रस्ट, ठाणे
५) अध्यक्ष/ सचिव, कुडूस विभाग शिक्षण सेवा संघ, पालघर
६) निवडनस्ती ( एसएम-१).